आवक क्र. ८६

रजिस्टर्ड नं. एमएच/एमबीआय-साऊथ/३०



# महाराष्ट्र शासन राजपत्र

असाधारण

प्राधिकृत प्रकाशन

मंगळवार, जुलै २१, १९९८/आषाढ ३०, शके १९२०

स्वतंत्र संकलन म्हणून फाईल करण्यासाठी या भागाला वेगळे पृष्ठ क्रमांक दिले आहेत

## भाग चार-अ

महाराष्ट्र शासनाने केंद्रीय अधिनियमान्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.

सामान्य प्रशासन विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २१ जुलै १९९८

फौजदारी प्रक्रिया संहिता, १९७३.

क्रमांक ओएफएल. १०९८/प्र. क्र. १०/९८/२० ब.—फौजदारी प्रक्रिया संहिता, १९७३ (सन १९७४ चा अधिनियम क्रमांक दोन) महाराष्ट्रास लागू करताना, त्या संहितेच्या कलम २७२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून आणि या बाबतीत काढण्यात आलेल्या पूर्वीच्या सर्व अधिसूचनांचे अधिक्रमण करून महाराष्ट्र शासन, याद्वारे, दिनांक २१ जुलै १९९८ पासून खालील अनुसूचीमध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेली प्रयोजने वगळून अन्य प्रयोजनांसाठी उच्च न्यायालयाव्यतिरिक्त, राज्यातील सर्व फौजदारी न्यायालयांची भाषा मराठी असेल, असे निर्धारित करीत आहे.

अनुसूची

(१) बजावणीसाठी व अंमलबजावणीसाठी इतर राज्यांकडे पाठविणे आवश्यक असतील असे रिट, अधिपत्रे, समन्स, नोटिसा व इतर आदेशिका आणि तत्संबंधीचा पत्रव्यवहार.

(२) शवपरीक्षेच्या टिप्पण्या आणि वैद्यकीय व तज्ञ साक्षीदारांचा पुरावा.

(३) जिल्हा न्यायालय व उच्च न्यायालय यांच्याकडे केलेल्या अपिलांचे व पुनरीक्षणाचे कागदपत्र (पेपर बुक्स).

(४) उच्च न्यायालयास सादर करणे आवश्यक असलेले कामकाज (न्यायिक व प्रशासनिक—दोन्ही).

(५) उच्च न्यायालय किंवा सांख्यिकी केंद्रे यांच्याकडे पाठवावयाची नियतकालिक पत्रके व विवरणपत्रे.

(६) लेखे, अर्थसंकल्पीय अंदाज यासंबंधीची सर्व लेखा पुस्तके व विवरणे आणि विवरणपत्रे व सेवाविषयक बाबींसंबंधीचा पत्रव्यवहार.

(७) विभागीय परीक्षा.

(८) विभागीय चौकशीसंबंधीच्या बाबी, त्यात अहवाल आणि उच्च न्यायालय व शासन यांच्याशी त्यावर केलेला पत्रव्यवहार यांचा समावेश होतो.

(९) उच्च न्यायालय आणि शासन यांच्याशी करावयाचा पत्रव्यवहार.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**मो. ब. अप्पलवार,**
**शासनाचे सचिव.**

सामान्य प्रशासन विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २१ जुलै १९९८

दिवाणी प्रक्रिया संहिता, १९०८.

क्रमांक ओएफएल. १०९८/प्र. क्र. ५०/९८/२०ब.—दिवाणी प्रक्रिया संहिता, १९०८ (सन १९०८ चा अधिनियम क्रमांक ५) महाराष्ट्र राज्यास लागू करताना, उक्त संहितेचे कलम १३७, पोट-कलम (२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून आणि या बाबतीत काढण्यात आलेल्या पूर्वीच्या सर्व अधिसूचनांचे अधिक्रमण करून, महाराष्ट्र शासन, याद्वारे असे घोषित करीत आहे की, याखालील अनुसूचीमध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेली प्रयोजने वगळून अन्य प्रयोजनांसाठी उच्च न्यायालयाला दुय्यम असलेल्या, राज्यातील सर्व दिवाणी न्यायालयांची भाषा दिनांक २१ जुलै १९९८ पासून मराठी असेल.

अनुसूची

(१) बजावणीसाठी व अंमलबजावणीसाठी इतर राज्यांकडे पाठविणे आवश्यक असतील असे रिट, अधिपत्रे, समन्स, नोटिसा आणि इतर आदेशिका आणि तत्संबंधीचा पत्रव्यवहार.

(२) वैद्यकीय व तज्ञ साक्षीदारांचा पुरावा.

(३) इतर राज्यांकडे अंमलबजावणीसाठी हस्तांतरित केलेले हुकूमनामे व आदेश आणि तत्संबंधीचा पत्रव्यवहार.

(४) जिल्हा न्यायालय व उच्च न्यायालय यांच्याकडे केलेल्या अपिलांचे व पुनरीक्षणांचे कागदपत्र (पेपर बुक्स).

(५) उच्च न्यायालयात सादर करणे आवश्यक असलेले कामकाज (न्यायिक व प्रशासनिक—दोन्ही).

(६) उच्च न्यायालय किंवा सांख्यिकी केंद्रे यांच्याकडे पाठवावयाची नियतकालिक पत्रके व विवरणपत्रे.

(७) विभागीय परीक्षा.

(८) लेखे, अर्थसंकल्पीय अंदाज यासंबंधीची सर्व लेखा पुस्तके व पत्रके आणि विवरणपत्रे व सेवाविषयक बाबींसंबंधीचा पत्रव्यवहार.

(९) विभागीय चौकशीसंबंधीच्या बाबी, त्यात अहवाल व उच्च न्यायालय व शासन यांच्याशी त्यावर केलेला पत्रव्यवहार यांचा समावेश होतो.

(१०) उच्च न्यायालय व राज्य शासन यांच्याशी करावयाचा पत्रव्यवहार.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मो. ब. अप्पलवार,
शासनाचे सचिव.

## GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 21st July 1998

CODE OF CRIMINAL PROCEDURE, 1973.

No. OFL. 1098/CR-50/98/20-B.—In exercise of the powers conferred by section 272 of the Code of Criminal Procedure, 1973 (II of 1974), in its application to the State of Maharashtra; and in supersession of all previous notifications issued in this behalf, the Government of Maharashtra, hereby with effect from the 21st day of July 1998, determines Marathi language to be the language of all Criminal Courts in the State other than the High Court except for the purposes specified in the Schedule hereto.

*Schedule*

(1) Writs, warrants, summonses, notices and other processes which are required to be sent for service or execution to other States, and correspondence connected therewith.

(2) Post mortem notes and evidence of medical and expert witnesses.

(3) Paper Books in Appeals and Revisions to the District Court and the High Court.

(4) Proceedings (both judicial and administrative) that are required to be submitted to the High Court.

(5) Periodical returns and statements to the High Court or statistical bureaus.

(6) All account books and returns and statements pertaining to accounts, budget estimates and correspondence pertaining to service matters.

(7) Departmental examinations.

(8) Matters relating to Departmental enquiries including reports and correspondence thereon with the High Court and Government.

(9) Correspondence with the High Court and Government.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

M. B. APPALWAR,
Secretary to Government.

## GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT

Mantralaya Mumbai 400 032 dated the 21st July 1998

CODE OF CIVIL PROCEDURE, 1908.

No. OFL. 1098/CR-50/98/20-B.—In exercise of the powers conferred by sub-section (*2*) of section 137 of the Code of Civil Procedure. 1908 (V of 1908) in its application to the State of Maharashtra and in supersession of all previous notifications issued in this behalf, the Government of Maharashtra hereby with effect from the 21st July 1998 declares that the Marathi shall be the language of all Civil Courts in the State subordinate to the High Court except for the purposes specified in the Schedule hereto.

*Schedule*

(1) Writs, warrants, summonses, notices and other processes which are required to be sent for service or execution to other States and correspondence connected therewith.

(2) Evidence of medical and expert witnesses.

(3) Correspondence connected with decrees and orders transferred to other States for execution.

(4) Paper Books in Appeals and Revisions to the District Court and the High Court.

(5) Proceedings (both judicial and administrative) that are required to be submitted to the High Court.

(6) Periodical returns and statements to the High Court or statistical bureaus.

(7) All account books and returns and statements pertaining to accounts, budget estimates, and correspondence pertaining to service matters.

(8) Departmental examinations.

(9) Matters relating to departmental enquiries, including reports and correspondence thereon with the High Court and Government.

(10) Correspondence with the High Court and Government.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

M. B. APPALWAR,
Secretary to Government.



शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई